महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास नागरी सेवा स्पर्धा परीक्षा या योजनअंतर्गत यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी,यशदा,पुणे या प्रशिक्षण संस्थेस सन २०१७-१८ ते २०१९-२० या ३ वर्षाचे थकित अनुदान व सन २०२०-२१ ते २०२१-२२ या २ वर्षाचे अनुदान अदा करण्याकरीता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील उपलब्ध निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:-अविवि-२०२१/प्र.क्र.७७/का-९,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

**दिनांक : ३ फेब्रुवारी,२०२२**

वाचा:- (१) शासन परिपत्रक , वित्त विभाग क्र. अर्थसं- २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.६/०४/२०२१.
(२) शासन निर्णय वित्त विभाग क्र. अर्थसं- २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४/०६/२०२१.
(३) महासंचालक,यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा)पुणे यांचे पत्र क्र.एसीईसी/२०२०/वी.प्रवेश/१८ दि.१७ ऑगस्ट,२०२१.

प्रस्तावना :-

राज्यातील अल्पसंख्याक समाजाचे राज्यसेवा,केंद्रिय सेवा व अखिल भारतीय सेवेतील प्रमाणे वाढावे याकरीता अल्पसंख्याक विकास विभागाच्या दि.२०.३.२०१० च्या शासन निर्णयान्वये स्पर्धा परीक्षा प्रशिक्षण योजना राबविण्यात येते. सदर योजना राज्य अल्पसंख्याक आयोगामार्फत राज्यातील उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अखत्यारितीतील राज्य प्रशासकीय सेवा प्रशिक्षण संस्था,मुंबई/कोल्हापूर/नागपूर/औरंगाबाद येथील प्रशिक्षण केंद्रामध्ये अल्पसंख्याक समूहातील प्रती प्रशिक्षण केंद्र १० उमेदवार तसेच दि.२७ सप्टेंबर,२०१० च्या शासन पत्रान्वये यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, यशदा,पुणे येथील डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (डॉ आंबेडकर स्पर्धा परीक्षा मार्गदर्शक केंद्र) यांच्या मार्फत केंद्रिय लोकसेवा आयोगाच्या परीक्षेसाठी अल्पसंख्याक समूहातील १० उमेदवारांना प्रशिक्षण देण्यात येते. संदर्भीय क्र.३ दि.१७ ऑगस्ट,२०२१ च्या पत्रान्वये महासंचालक,यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, यशदा,पुणे यांनी सन २०१७ पासून सदर प्रशिक्षणाच्या दरात प्रती उमेदवार रु.१ लक्ष वरुन रु.२,१०,६१०/- या प्रमाणे वाढ केल्यामुळे सन २०१७-१८ ते २०१९-२० या ३ वर्षाचे थकित अनुदान व सन २०२०-२१ ते २०२१-२२ या २ वर्षाचे अनुदान वितरीत करण्याची विनंती केली आहे. त्यास अनुसरुन सन २०२१-२२ आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीमधून सदर अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मराठी भाषा फौन्डेशन योजना व स्पर्धा परिक्षा मार्गदर्शन केंद्राकरीता सन २०२१-२२ वर्षासाठी "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५८ (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या या लेखाशिर्षा अंतर्गत एकूण रु.४.०० कोटी एवढा निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे. त्यापैकी संदर्भीय क्र. २ च्या वित्त विभाग परिपत्रक दि.२४/६/२०२१ अन्वये सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात एकूण अर्थसंल्पीत निधीच्या ६० % च्या प्रमाणात निधी वितरीत करण्यास परवाणगी देण्यात आली आहे. तथापि कार्यक्रमावरील खर्चाकरीता निधी वितरण करण्यापूर्वी वित्त विभागाची मान्यता घेणे आवश्यक आहे.

२. त्यानुसार स्पर्धा परीक्षा योजनेअंतर्गत यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, यशदा,पुणे येथील डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था(डॉ आंबेडकर स्पर्धा परीक्षा मार्गदर्शक केंद्र) यांच्या मार्फत केंद्रिय लोकसेवा आयोगाच्या परीक्षेसाठी अल्पसंख्याक समुहातील १० उमेदवारांना प्रशिक्षण देण्यात येते. याकरीता प्रती उमेदवार रु.१ लक्ष याप्रमाणात रु.१० लक्ष एवढा निधी प्रती वर्षी महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग याच्यामार्फत महासंचालक,यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, यशदा,पुणे अदा करण्यात येतो. तथापि सन २०१७ पासून प्रवेश परीक्षा समितीच्या मान्यतेनुसार प्रती उमेदवार रु.१ लक्ष वरुन रु.२,१०,६१०/- एवढा प्रशिक्षण दर निश्चित करण्यात आलेला आहे. त्यानुसार सन २०१७ ते २०१९ या ३ वर्षाचे थकित अनुदान रु. ३३,१८,३००/- व सन २०२०-२१ व २०२१-२२ या वर्षामध्ये कोव्हिड-१९ या विषाणू संसर्गामुळे उदभवलेली परिस्थिती व त्यानुसार लावण्यात आलेले निर्बध यामुळे सदर प्रशिक्षण हे ऑनलाईन घेण्यात आल्यामुळे सन २०२०-२१ या वर्षामध्ये रु.११,११,७००/- व सन २०२१-२२ या वर्षामध्ये रु.११,३१,८००/- असे एकूण रु.५५,६१,८००/- (अक्षरी रु.पंच्चावन लक्ष एकसष्ठ हजार आठशे फक्त )एवढा निधी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित तरतूदीमधून महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग यांच्यामार्फत यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, यशदा,पुणे यांना वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिली आहे.

३. त्यास अनुसरुन स्पर्धा परीक्षा योजनेअंतर्गत यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी यशदा,पुणे या संस्थेस सन २०१७ ते २०१९ या ३ वर्षाचे थकित अनुदान रु. ३३,१८,३००/- ,सन २०२०-२१ या वर्षाचे रु.११,११,७००/-व २०२१-२२ या वर्षाचे रु.११,३१,८००/- असे एकूण रु.५५,६१,८००/- (अक्षरी रु.पंच्चावन लक्ष एकसष्ठ हजार आठशे फक्त )एवढे अनुदान अदा करण्याकरीता "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २५८ (कार्यक्रमावरील खर्च), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली रु.५५,६१,८००/- (अक्षरी रु.पंच्चावन लक्ष एकसष्ठ हजार आठशे फक्त )एवढा निधी मंजूर करुन सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांना वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोग,मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता अवर सचिव,महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग हे आहरण व संवितरण अधिकारी तर सचिव महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोग,मुंबई हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोगाने उपरोक्त विवरण पत्रात

दर्शविलेल्या निधीचा विनियोग विहित मर्यादेपर्यंतच करावा. या आदेशान्वये वितरित करण्यात आलेल्या रकमेतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) विहित नमून्यात शासनास सादर करणे आवश्यक राहील. संदर्भ क्र.२ शासन परिपत्रक, वित्त विभाग अन्वये विहीत अटी व तरतुदींचे पालन, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्यांक आयोगाने करावे. तसेच सदर वितरीत निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर केल्याशिवाय पुढील अनुदान वितरीत केले जाणार नाही.

५. उपरोक्त रक्कम “मागणी क्रमांक झेडई-१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम राज्य योजनांतर्गत योजना (०१) (१७) राज्य अल्पसंख्याक आयोग (योजनांतर्गत) (२२३५ ए २५८) (कार्यक्रमावरील खर्च), ३१सहायक अनुदान (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

६. “सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग शासन निर्णय वित्त विभाग क्र. अर्थसं- २०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४/०६/२०२१.येथील सर्व अटींची व त्यासोबतच्या परिशिष्टांमधील अटींची पूर्तता होत आहे. तसेच सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२२/२०२२/व्यय-१ दि.३१.१.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२०३१७००४४१५१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, pseudonym=1F9A10571D88646ED6CD168DADBFEDACC3DD2F35, serialNumber=6ADB2BDBBD3BD651A8ADE806B6E4AEA66DAA5512EA788889AF1515751ABC0181, cn=DINESH MADHAVRAO SONAVANE
Date: 2022.02.03 17:02:07 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु. सचिव,
३) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री (अविवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
५) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
६) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
७) संचालक, लेखा व कोषागार, संचालनालय,मुंबई,
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

१०) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व),

११) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई,

१२) महासंचालक,यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी,(यशदा)पुणे,

१३) कक्ष अधिकारी (का. ७ ), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,

१४) निवडनस्ती (कार्यासन-९)